GAP भाषा
A MULTILINGUAL JOURNAL OF RESEARCH
( ISSN – 2582-8770 )
Globally peer-reviewed and open access journal.

# 'भिया' आणि 'थाळी' या दोन गोर कवितांमधील नवबंजारा समाजाचा चिकित्सक अभ्यास

**डॉ. संतोष राठोड,**
मुंबई विद्यापीठ, मुंबई

तौलनिक साहित्याचा अभ्यास करताना जरी दोन वेगवेगळ्या गोष्टीतील समानता आणि वेगळेपणा शोधत असलो, तरी त्यांचा वापर एक श्रेष्ठ दुसरा कनिष्ट वा एक उच्च दुसरा नीच ठरविण्यासाठी होत नसून त्या, दोघांवरचा सामाजिक प्रभाव, दोघांचा स्रोत तपासणे हाच तुलना करण्याचा हेतू असतो, हे तौलनिक साहित्य अभ्यासाची महत्वाची अट मानली जाते. हीच बाब लक्षात ठेवून मी दोन कवितेची निवड केलेली आहे.

गोर साहित्य म्हणजे काय? गोर साहित्याची प्रमुख वैशिष्ट्ये कोणती? कवी दयाराम आडे आणि कवी जय चव्हाण यांच्या कविता गोर साहित्याच्या कसोटींना कितपत उतरतात? नव बंजारा म्हणजे कोण? तो जुन्या बंजारापेक्षा कसा वेगळा आहे? अशा प्रश्नांचा उहापोह, या लेखामध्ये करण्याचा प्रयत्न आहे.

नव बंजारांची भटकंती संपलेली आहे. पूर्व ब्रिटीशकालीन किंवा ब्रिटीशकालीन तांडा, तांड्याचा रहिवासी, तांड्याची संस्कृती, तो गावापासून तुटलेला नसून गावचा भाग झाला आहे आणि तांड्याची गोरवट विसरत चालला आहे. तो आधुनिक शिक्षणाचा भाग झाला आहे. त्याचा बहुधार्मिक समाजासी संपर्क आला आहे. थोडक्यात, त्याच्या जुन्या समस्या आणि आजच्या समस्या पूर्णतः वेगळ्या आहेत. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर गोर माटी आणि कोर[1] यांच्यामधील फरक सांगणारी रेषा फारच सूक्ष्म झालेली आहे. ती ओळखता येणे कठीण आहे.

निवडलेल्या दोन्ही कविता ढोबळमानाने पुढील अर्थ काढता येतो. घरामध्ये एकाला शेतीत तर दुसऱ्याला शाळेत पाठविल्यामुळे दोन सख्याभावांचे दोन वेगळे जग झाल्याचे दाखविले आहे. एकाचे जीवनमान गुणवत्ता बदलून गेली, आर्थिक स्तर बदलले, सामिजक किंवा सांस्कृतिकस्तर सुद्धा बदलून गेला. शिक्षणामुळे दुसऱ्या संस्कृतीचा मोठ्या प्रमाणात आयात केल्यामुळे स्वतःची संस्कृती विसरून जावी लागत आहे. तर शिक्षण नसल्यामुळे, निरक्षर राहिल्यामुळे सांस्कृतिक ठेवा जपून ठेवण्याचे कार्य निरक्षर व्यक्ती आणि समाजावर येवून पडते. असा संदेश कवी दयाराम आडे यांच्या कवितेतून देतात.

दयाराम आणि जय यांच्या दोन्ही कवितेतील दुःख हे अशिक्षित भावांचे आहे. दोन्ही कवी औपचारिकरीत्या तसे साहित्याशी संबंध नसलेले आहेत. दयाराम बी.एम.सी.मध्ये निरीक्षक म्हणजे प्रशासनाची त्यांची पार्श्वभूमी आहे तर जय विज्ञान आणि तंत्रज्ञान पार्श्वभूमीचा असून ते प्राध्यापक आहेत. तरीही दोघांचेही साहित्याचीजाण, साहित्यनिर्मितीची सृजनशीलता साहित्याचे औपचारिक शिक्षण घेतलेल्या लेखकांसारखेच आहे, यात शंका नाही. या दोन्ही कविता मुक्त छंदामध्ये लिहिलेल्या असून त्यांचा आशय विषय वरवरून वेगळे वाटत असले तरी त्यांचा संरचनेत सारखेपणा आहे. या दोन्ही कविता प्रकाशित स्वरूपात उपलब्ध होत नसल्यामुळे, मी कवींच्या परवानगीने येथे देत आहे.

भिया

कवी- दयाराम आडे, देवठाणा, पुसद, यवतमाळ

एके बापूर आपण सगे भाई
तोन शाळेम, मन काढे खेतेमाई
तार पग फडसीपर, मार किचडे माई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार काई रे

शिक्षणे बरोबर तार बदलगो रूप,

थाळी

कवी- जय चव्हाण, भुली, मानोरा, वाशिम

साहेब भिया मारे घर, आज भी उज ग्लास
उज कचोळी, उज छ कतलेर थाळी...
भिया तारो जग नाळी, भिया मारो जग नाळी ||मु||

भेन तारो शिक्षण आपणे घरेन काई दिनो
होच तट्टा, होच पत्तर, दरवाजो छ जुनो

[1] जो गोर नाही तो कोर. बंजारेत्तर.

गावडीरे घीयेन तू केये लागो तूप,
आपण याडी तारे सारू व्हेगी आई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे

साहेबेरी छोरी मळी तोन मार वहिनी
तारे शिवाय वोन कोई चायेनी
याडीरो आयुष्य चलेगो दुःखेमाई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे

मोठे सगासेण जसे घर आव
वो बाजेप, बापू हेट बेस जावं
श्रीमंती गरीबीरी दरी मिटायीस कांई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे

भायारे कृपाती तोन छेनी कांई कमी
तरी तीन एकरेम कीची जमीन कर नामी
वगाडो संसार मारो ढाकीस कांई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे

उंदाळो, वरसाळोराबू खेतेमाई
साले ती साल जारे दुष्काळेमाई
तंगीती कपडा कोनी मळे डीलेमाई रे
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे...
भिया तू तो व्हेगो साहेब, पण मार कांई रे...

तार नोकरी सारू वावर वेचायेर आवगी पाळी
भिया तारो जग नाळी, भिया मारो जग नाळी ॥मु२॥

पिसा आदला कमान भिया मोटो तू वेगो
मारोच नसिब कट जान सोगो
तू खारो पंचपकवान, म उज ढळको लगावण
टनको दी डळी...
भिया तारो जग नाळी, भिया मारो जग नाळी ॥मु३॥

भिया छोरी मार वायान आवगी
हे लोग माती हानु कू वागेलाग
तारो नाम लेन मन हुंडा मांगेलाग
आब तू मार छोरी वळाईस जना
मारो जीवडा पडीय हाळी...
भिया तारो जग नाळी, भिया मारो जग नाळी ॥मु४॥

या कवितेला गोर कविता म्हणायचे काय? गोर कविता ही कोर कवितेपेक्षा वेगळी असते काय? एखाद्या कवितेला किंवा लेखनाला गोर कवितेचा किंवा लेखनाचा स्थान मिळवायचे असेल तर त्याला कमीत कमी तीन-चार कसोट्या पूर्ण कराव्या लागतील म्हणजेच ती गोर कविता होईल. एक, ती गोरबोलीमध्ये असावी. बंजारा समाज वेगवेगळ्या राज्यांमध्ये अस्तित्वात आहे त्यांची एक बोलीभाषा आहे. त्या भाषेला लिपी नाही. मग स्वतःची लिपी नसताना लिहावे कसे, हा एक मोठा अडथळा साधारणतः प्रत्येक गोर लेखाकापुढे आहे. आज बंजारा समाज भारतात आधुनिक शिक्षण पद्धतीने शिक्षण घेऊन बाहेर पडत आहे म्हणून या शिक्षण व्यवस्थेने त्याला दिलेल्या त्रि-भाषिक सूत्रांमुळे त्याला कमीतकमी तीन भाषेची लिपी अवगत झालेली आहे. उदाहरणार्थ इंग्रजी, हिंदी आणि त्याच्या राज्याची भाषा मग ती मराठी असेल, कन्नड असे, तेलगु असेल. लेखकाला सोयीस्कर आणि सहज लिहिता येईल, त्या लिपीचा वापर करून गोर साहित्य त्याला लिहिण्याची संधी आहे ज्यामुळे गोर लोक साहित्य आणि गोर कला समृद्ध आहेत तेवढेच लिखितसाहित्य समृद्ध होईल आणि गोर समाजाचा व्यक्तिशः ऋण फेडले जातील. अशा गोर साहित्यनिर्मितीचे भविष्यात गट, गटबाजी, तुकडे होण्याचे धोके नक्कीच आहेत. त्यांच्यामध्ये मराठी-गोरसाहित्य, कन्नड-गोरसाहित्य, रोमन-गोरसाहित्य इत्यादी असे हायफनेटेड नामाभिधान होऊ शकते. अशा साहित्याचा वाचक जरी ती भाषा लिहिता वाचता येणारा यांच्या पुरते मर्यादित असला तरी आज सायबर युगात तो साहित्य श्रवणग्रंथाद्वारे ऐकून समजणारा वाचक एकत्र बांधण्याची ताकत त्यांच्यात आहे.

दोन, गोर साहित्याचा विषय हा गोरवट, गोरसंस्कृती, गोर बंजारा समाजाचा भूतकालीन सामजिक व सांस्कृतिक परिस्थिती, त्यांचे धार्मिक भावभावना, सण, उत्सव, त्यांच्या वर्तमान काळातील दशा आणि दिशा, जागतिकीकरणात भारतासारख्या बहुसांस्कृतिक, बहुभाषिक समाजव्यवस्थेत त्यांची होणारी घुसमट इत्यादी महत्वाचे विषय हे गोर साहित्याचे विषय असू शकतात. गोर लोकसाहित्य एवढे भक्कम आहे की, त्यातून गोर साहित्य नवे रूपक, नवी

GRAND ACADEMIC PORTAL
RESEARCH JOURNALS
GAP भाषा
A MULTILINGUAL JOURNAL OF RESEARCH
( ISSN – 2582-8770 )
Globally peer-reviewed and open access journal.
ज्ञान: अध्ययन: परम्परा

प्रतिमा, नवी मांडणी, नवे कथनक देऊन भारतीय साहित्याच्या परंपरेची वाढ करू शकते, हे गोर साहित्यिकांनी लक्षात घेतले पाहिजे.

तीन, तो जातीने जरी बंजारा नसला तरी कर्माने बंजारा असावा. त्याचा समाजातील अनिष्ठ, वाईट, प्रथा, परंपरेवर हल्ला चढवून गोरवट सुधारण्याचा त्याचा ध्यास असावा. तो शरीराने कोर असू शकतो. पण भाषेने आणि जाणीवेने गोर असेल. त्याला गोर समाजाविषयी गैरसमज असू नयेत, गोरबद्दल अज्ञानी असू नये, तो डोक्याने आणि मनाने गोर समजलेला असावा. उलट तो जातीने बंजारा असेल पण त्याला 'बंजारापणा' माहित नसेल तर तो बऱ्याच गैरसमजूती पसरवू शकतो. असे साहित्यिक गोर साहित्यिक म्हणून कधीच पात्र होऊ शकत नाहीत. या चौकटीमध्ये राहून लेखन केल्यास गोर साहित्याची वृद्धी आणि विकास होऊ शकतो. परिणामी, शासकीय, निम-शासकीय आणि अशासकीय पातळीवरून धोक्यात सापडलेली आणि नाहीशी होत चाललेल्या गोरबोली भाषेला वाचविण्यासाठीचे प्रयत्न यशस्वी होतील आणि त्या भाषेला पुनर्जीवन मिळू शकते. यामाध्यमातून गोरवट जपून ठेवता येईल.

चार, हे साहित्य कोणासाठी लिहायचे? याचा वाचक कोण: गोर की कोर? समजा हे साहित्य मराठी म्हणजेच देवनागरी लिपीला वापरून लिहिले तर गोर भाषा जाणकार, कन्नड, तेलगू, तमिळ लिपी जाणकार कोर या साहित्यापासून वंचित राहण्याची शक्यता आहे. पण वर म्हटल्याप्रमाणे श्रवणग्रंथ हे प्रश्न सोडविण्यात काहींसा मदत करतील पण हा विषय नवीन आहे. हाच प्रश्न कोंकणी भाषेपुढे होता जेव्हा ती मराठी भाषेतून स्वतंत्र होऊन भारतीय राज्यघटनेच्या आठव्या परिश्ष्टमध्ये समाविष्ट झाली, तेव्हा कोंकणी देवनागरी, कोंकणी आणि रोमन लिपीद्वारे लिहिली जात होती. अशीच कथा संथाळीची आहे. या भाषा आज वाढल्यात त्यांच्यात साहित्य निर्मिती होऊ लागली. त्यांच्यात ज्ञानवितरण आणि ज्ञाननिर्मिती होऊ लागली आहे. दक्षिण भारतात एक बेटा कुंबा नावाची आदिवासी जमात आहे. त्यांची भाषा बोलणारे तामिळनाडू, केरळ आणि आंध्रप्रदेश या राज्यामध्ये राहतात. या भाषेला तमिळ, मल्याळम, तेलगू या भाषांचे व्याकरण, भाषिक संरचना आणि लिपीचा वापर करून मोठ्या प्रमाणावर लिहिण्याचा प्रयत्न होत आहे.[2] म्हणून गोर बोलीला प्रांताप्रांतामध्ये ज्याला जी लिपी उपलब्ध आहे त्यालिपीमध्ये लिहिणे हाच एक चांगला/मध्यम मार्ग सुरुवातीच्या टप्प्यात करणे गरजेचे आहे. परिणामी त्या लिपीचा ज्ञान असलेला गोर वाचक हा त्या साहित्याचा वाचक बनू शकतो आणि त्या भाषेतील ज्ञानाचा फायदा घेऊ शकतो. असे बरेच 'कोर' पण असतात जे तांड्यामध्येच मोठे होतात ते सुद्धा एक गोर लेखक वा समीक्षक बनू शकतात कारण आदिवासी कवी भुजंग मेश्राम याने त्यांच्या 'उलगुल्लान' या कविता संग्रहात शुद्ध गोर भाषेत आणि चक्क काही गोर पात्राविषयी कविता लिहिल्या आहेतच, हे काही वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही.

दयाराम आडे यांची 'भिया' नावाची कविता अत्यंत गाजलेली असून अनेक साहित्य संमेलनामध्ये वाचलेली आहे. कारण ही कविता अमिताभ आणि शशी कपूर यांचा हिंदी सिनेमा 'दिवार' चा डायलॉगने मांडलेल्या भाव विश्वाचा दुसऱ्या अंगावर प्रकाश टाकते. "मेरे पास बंगला है, पैसा है, गाडी है. तेरे पास क्या है?" असा सवाल जेव्हा अनपढ, गुंडगिरी, आणि गुन्हेगारी दुनियामध्ये असणारा एक भाऊ दुसऱ्या भावाला करतो, तेव्हा दुसरा भाऊ सुशिक्षित, प्रामाणिक, बंधू-प्रेमी, सन्मानीय जगाचा प्रतिनिधी म्हणून उत्तरतो, "मेरे पास माँ है." या दोन्ही भावांचे जग वेगवेगळे आहेत. एकाला जगाचे भौतिक आणि आर्थिक बळ लाभलेले आहे तर दुसऱ्याच्या जगाला सामाजिक व सांस्कृतिक महत्व आहे. दोघांना ही आपापले जग प्रिय आहे. एवढेच नव्हे तर एक दुसऱ्याला विचारतो की तू तुझा जग सोडून माझ्या विश्वात ये. अशा दोन भावांतील संबंध या दोन गोर कवितेतून मांडलेला आहे ते असे:

'भिया' ही कविता सहा कडव्यांमध्ये लिहिलेली आहे. प्रत्येक कडव्यानुसार कवितेचे विश्लेषण खालीलप्रमाणे करता येईल. संपूर्ण कवितेचा निवेदक हा शाळेतील गळतीचा बंजारा विद्यार्थी आहे. त्यांच्याकडे तीन एकर शेती आहे. तर त्याचा भाऊ शिक्षणानंतर नोकरीला लागलेला आहे आणि त्याचे लग्न दुसऱ्या साहेबाच्या मुलीशी झालेले आहे.
पहिल्या कडव्यामध्ये दोघांची आई एक, वडील एक. मात्र वागवणूक सावत्र भावासारखी: एकाला शेतात तर दुसऱ्याला

[2] Gail Coelho, "Issues in Orthography Design in a Multilingual Environment" a paper Presented in a Conference at Mumbai University on 7th March, 2018

शाळेत. परिणामी एकाचे भविष्य सुरक्षित आहे कारण तो नोकरीला लागलेला आहे. त्याला दर महिन्याला वेतन मिळते. मग दुसऱ्याच्या भविष्याचं काय? हे कधी आई वडिलांना तर सोडा, त्याच्या नोकरीला लागलेल्या भावाला सुद्धा त्याबद्दल कधी विचार येत नाहीत. ही खंत कवीने दुसऱ्या भावाच्या अविर्भावातून व्यक्त केलेली आहे.

दुसऱ्या कडव्यामध्ये कवी शिक्षणाचा परिणाम कसा झाला याविषयी लिहितो. डॉ. बाबसाहेब आंबेडकर म्हणायचे, “शिक्षण हे वाघिणीचे दूध आहे. ज्यांनी ते पिले ते डरकळल्याशिवाय राहत नाही.” शिक्षणाची ही किमया दयारामच्या सुशिक्षित भावात दिसत नाही. शिक्षण घेऊन सुद्धा तो डरकाळत नसून गप्प बसला आहे. मठ्ठ आहे. तो सक्रिय नसून निष्क्रिय आहे. उलट हा गोर शिक्षित साहेब भारतीय समाजशास्त्रज्ञ, एस. एन. श्रीनिवासच्या “संस्कृतीकरण”चा बळी पडला आहे. संस्कृतीकरण म्हणजे उच्चजाती धर्मांचे आचार-विचार आदर्श मानून अनुकरण करणे होय. ह्या कवितेचा मठ्ठ बंजारा  ‘घी’ला तूप आणि ‘याडीला’ आई तसेच पुढील कडव्यामध्ये ‘भोजाई’ला वहिनी म्हणतो. आपण सुशिक्षित आहोत हे दाखविण्यासाठी तथाकथित उच्च, श्रेष्ठ समाजाचे तो अनुसरण करतो. कालांतराने हे स्वतःची संस्कृती, बोलीभाषा, सण, उत्सव विसरतात. परिणामी असे नवशिक्षित गोर बंजारा त्यांची गोरवट विलुप्त करण्यात कारणीभूत ठरतात, असे कवीला यातून सांगावयाचे आहे.

तिसऱ्या कडव्यामध्ये कवी पहिल्या पिढीतील नोकराचे नातेवाईक आणि त्यांचे सोयरे जे दुसऱ्या पिढीतील नोकर आहेत याच्यातील दर्जा आणि वर्ग विभाजन यावर भाष्य करतो. गरीबाचा मुलगा नोकरी मिळताच श्रीमंताचा जावई होतो तर श्रीमंताची मुलगी गरीबाची सून, वहिनी जरी झालेली असली तरी, ती स्वतः फक्त बायको म्हणूनच नवनात्यांचा स्वीकार करीत असते. तिला सासू, सासरे, दीर, जावू, नणंद इत्यादी नात्याशी काही देणं-घेणं नसते. पुढे याच कडव्यामध्ये निवेदक म्हणतो की, या संपूर्ण आयुष्यात त्याची आई कष्टाचे, गरीबीचे, दुःखाचे जीवन जगत असते. कोठेतरी सुखाच्या दिवसाची चाहूल लागली तरी तिच्या आयुष्यात नोकरीवाल्या मुलाकडे जाऊन सुख भोगण्याची सवलत मिळत नाही. हाच विषय कवी पुढच्या कडव्यामध्ये चालू ठेवतो.

जेव्हा जेव्हा त्यांचे श्रीमंत सगे सोयरे पाहुणे म्हणून त्यांच्या घरी उतरतात, तेव्हा त्यांच्या घरच्या बाजा कमी पडतात म्हणून पाहुण्यांना बाजेवर तर त्यांच्या वडिलांना खाली जमिनीवर बसावे लागते. गोर धर्मामध्येच नाही तर संपूर्ण भारतीय संस्कृतीमध्ये सगे ‘समंधी’ यांच्यात कधीच उच्चनीचता नसते. आर्थिक बाजू न जुमानता ते समान मानतात.त्यामुळे ते दोघेही आजूबाजूला एकाच बाजेवर बसण्याची अपेक्षा असते. परंतु या श्रीमंत गरीब वर्गामुळे एक वर बसतो तर दुसरा खाली. ती श्रीमंती-गरिबीची दरी तशीच कायम ठेवताना दिसते. विरोधाभास असा आहे की ही दरी निर्माण करणारा नवबंजारा आहे. तोच ती दरी मिटविण्यासाठी महत्वाची भूमिका पार पाडू शकतो परंतू निवेदकाला माहित आहे की त्याचा स्वभावावरून तो कधीही ही दरी मिटवू शकणार नाही.

पुढच्या कडव्यामध्ये कवितेचा निवेदक म्हणतो की देवाच्या आणि दैवाच्या कृपेने त्याची सामाजिक आणि आर्थिक परिस्थिती सुधारलेली आहे तरीही त्याची नजर मात्र वडिलोपार्जित तीन एकर जमिनीवर दिसते. त्याचाही तो कार्येदेशीर वारसदार आहे म्हणून मागणी घालतो आणि गरीब भावाला अजून गरीब बनविण्याचे निर्दयी पाऊल उचलतो तेव्हा त्याचा गरीब भाऊ पुन्हा एक अलंकारिक प्रश्न विचारतो की त्याच्या बुडत्या संसाराला स्वतःचा भाऊ वाचविल काय?
शेवटच्या कडव्यामध्ये कवी म्हणतात की, उन्हाळा, पावसाळा , हिवाळा शेतीमध्ये राबण्यात चाललेत. असेच आयुष्यातील वर्षे पुढे निघून जात आहेत. एकीकडे काबाड कष्ट, तर दुसरीकडे दुष्काळ यांच्या कचाट्यात सापडल्यामुळे मुलभून गरजा सुद्धा भागविणे शक्य होत नाही आहे. शिवाय नोकरदार भावाच्या आधारे काही करता येईल काय, ही आशा विझून गेलेली आहे.

‘भिया तू तो व्हेगो साहेब, मार काई रे’ ही ओळ धृपद म्हणून प्रत्येक कडव्यामध्ये वापरली आहे. तसेच या धृपदामध्ये इंग्रजीचा रिटॉरीकल प्रश्न आहे ज्याचा उत्तर कवीला माहित आहे, निवेदकाला माहित आहे, वाचकाला माहित आहे, पुढे त्याचे काय होणार आहे? या कवितेला ‘भिया’ पेक्षा ‘भिया तू तो व्हेगो साहेब, मार काई रे’ हा मथळा अजून अधिक समर्पक वाटला असता.

कवि. प्रा. जय चव्हाण यांची ‘थाळी’ ही कविता सुद्धा दोन भावंडामधील वर्ग विभाजन/वर्ग जाणीव याविषयी आहे. एक

सुशिक्षित, नोकरदार, आणि शहरी संस्कृतिशी एकरूप झालेला तर दुसरा ग्रामीण, शेतकरी कुटुंबाचे प्रतिनिधित्व करणारा आहे. ही कविता चार कडव्यामध्ये विभागली आहे. सुरुवातीच्या कडव्यामध्ये कवी दोन भावांच्या दोन विश्वाचे वर्णन करतात. एक ऑफिसर आहे. त्याचा जग वेगळे आहे किंवा विरुद्ध आहे. तो पूर्णपणे बदललेला आहे. त्याच्या घरची परिस्थिती बदललेली आहे. तर दुसऱ्याची आर्थिक आणि सामाजिक परिस्थिती आहे तीच आहे. कवी म्हणतो तोच जुना ग्लास, तीच वाटी आणि तीच जर्मनची/कथिलाची ताट. जर्मनचे/कथिलाचे भांडे म्हणजे अति दारिद्र्याचे सिम्बॉल किंवा मेटोनिमी आहे. कारण कथिल हा सर्वात स्वस्त धातूपैकी एक आहे. घरचे भांडे जेव्हा पितळाचे, तांब्याचे, चांदीचे, वा सोन्याचे असतात तस तसे त्याघरची सामाजिक प्रतिष्टा लक्षात येऊ शकते. या कवितेत एका भावाच्या भांड्याचे धातू बदलले नाही म्हणजे परिस्थिती तीच आहे. याविरुद्ध त्याच्या नोकरीवाल्या भावाची परिस्थिती बदलेली आहे. असे दोन भावाचे दोन परस्पर विरोधी जग आपल्यापुढे कवी मांडतात.

जर तुम्हाला एक सुगी हवी असेल तर धन्य पेरा, दहा सुग्या हव्या असतील तर झाडे लावा आणि शेकडो वर्षे सुग्या काढायच्या असतील तर शिक्षण द्या अश्या अर्थाची एक चायनीज कविता आहे. किंवा शिक्षण आणि व्यक्तिमत्व विकास पर्यायाने समाज व राष्ट्राचा विकास होत असतो असे आपण मानतो. परंतु जय चव्हाण दुसऱ्या कडव्यामध्ये या प्रतिपादनाला किंबहुना दाव्याला आव्हान करतो. हा दावा सगळीकडे, सर्वदा खरं होऊ शकत नाही असे ते कवितेतून दाखवतात. तो म्हणतो की शिक्षणाने त्याला काय दिले तर काहीच नाही. त्याच्या घरचे तट्टे तेच आहेत, त्याच्या घरचे पत्रे/छप्पर जुनेच आहेत, दरवाजे सुद्धा तेच आहेत. शिक्षणाने त्याच्या जीवनात काही फरक पडला असेल तर त्याची शेती, संपत्ती, मालमत्ता कमी झाली कारण शिक्षण संपल्यानंतर नोकरी मिळविण्यासाठी त्यांना शेती विकून, डोनेशेन देऊन नोकरी मिळवावी लागली. स्वतः घरदार, आईवडील, भाऊ सोडून वेगळा राहू लागला. अशा पद्धतीने दोन भावांचे दोन जग वेगवेगळे झालेत. "भिया तारो जग नाळी, भिया मारो जग नाळी" ही ओळ धृपद म्हणून संपूर्ण कवितेमध्ये आलेली आहे.

पुढच्या कडव्यामध्ये कवी म्हणतो, की एक भाग्यशाली ठरला तर दुसऱ्याचे दुर्भाग्य आहे. त्यामुळे एकाला पंचपकवान म्हणजे पौष्टिक अन्न मिळतो तर दुसऱ्याला तोच त्याच जुना एक-दोन हड्डीचे तुकडे पातळ रस्सामध्ये खावं लागते. असे एकाच जगाचे दोन वेगळे जग निर्माण होतात.

शेवटी कवी म्हणतो की एकाची मुलगी लग्नाला आली की लोकं दुसऱ्याच्या सामाजिक दर्जा आणि प्रतिष्ठा पाहून पहिल्याकडे अधिकच्या हुंड्याची अपेक्षा करतात. कदाचित भावाची प्रतिष्ठा नसती तर याला कमी हुंड्यात लग्न लावता आला असता. ही गोष्ट जेव्हा पहिल्या भावाला कळायला लागते तेव्हा तो म्हणतो जेव्हा हुंडा देऊन गरीब भावाच्या मुलीचा तो लग्न लावील तेव्हाच गरीब भावाच्या मनावरचा ताण आणि हृदयावरचा भार कमी होईल, पण ही अपेक्षा कधीही पूर्ण होणार नाही, हे सगळ्यांना कळतं. अशाप्रकारे कवी जय चव्हाण यांनी स्वातंत्र्योत्तर काळातील दोन गोर बांधवाच्या दोन वेगळ्या विश्वाचे चित्र टिपले आहे.

वरील दोन्ही कवितेत एक भाऊ दुसऱ्या भावाला जगण्याचे बरेच अवघड प्रश्न विचारतो तेव्हा ह्या कविता बंजारा गोर साहित्यातच नाही तर कोर साहित्यामध्ये सुद्धा जागा घेण्याची क्षमता ठेवतात. याच दर्जाचे गोर साहित्य लिहिणे दयाराम आणि जय सारखे अनेक गोर आणि कोर कवी उपरोक्त सांगितलेल्या चौकटीत गोर साहित्यनिर्मिती करणे काळाची गरज आहे. आणि ते होणारच कारण बरेच गोर बंधू भगिनी आज गोरबोलीमध्ये लिहित आहेत. स्वतःला व्यक्त करत आहेत. काही नवे गोर कवी, लेखक हे गोरबोली, मराठी, इंग्रजी भाषेमध्ये सुद्धा बंजारा संस्कृती मांडतात. काही गोर साहित्याला इंग्रजीमध्ये लिहून बाहेरील जगाला गोर साहित्याची ओळख करून देतात. त्यापैकी बाहेर प्रकाशित झालेले प्रा. दिनेश राठोड यांचे 'गोरपण: द लीन्ग्वीस्टिक ब्युटी इन गोरबोली डायलेक्ट' प्रा. संतोष राठोड (मी नाही) यांचे 'गोर बोलीम इंग्लिश बोलेर सिका' हे प्रयोग महत्वाचे आहेत. वीरा राठोड हे गोरबंजरा समाजाचा हिरा याने युवा साहित्य अकादमी पुरस्कार जिंकून भारतीय साहित्याच्या इतिहासात बंजारा समाजाचे नाव नोंदविले आहे. पी. विठ्ठल, सुदाम राठोड, सुरेश राठोड, श्रीकांत पवार, रमेश जाधव, प्रा. फुलसिंग जाधव, डॉ. रमेश राठोड, रमेश राठोड, प्रा. रविन्द्र राठोड असे अनेक बंजारा प्रत्येक क्षेत्रात लक्षणीय काम करताना दिसतात. अर्थातच या नव्या पिढीला बळीराम पाटील, प्रा. मोतीराज राठोड, आत्माराम कानिराम राठोड, भिमाणीपुत्र मोहन नाईक, याडीकार पंजाब चव्हाण,

हरीशंद्र राठोड, गबरुसिंग राठोड इत्यादी मंडळीचे मार्गदर्शन यांच्या पाठीशी आहे. त्याच बरोबर शासन, प्रशासन, शिक्षण, प्रसारमाध्यम, न्यायव्यवस्था, राजकारण, समाजकारण, सिनेमा, इ. चळवळीत नव बंजारा पहावयास मिलतो. हे सगळं शक्य होते चांगल्या नेतृत्वाने जे मा. वसंतरावजी नाईक याने सुरु केले आणि आज मा. संजय राठोड, मा. हरिभाऊ राठोड, मा. राजूसिंग नाईक तोच वारसा पुढे नेतांना दिसतात. जय सेवालाल! जय महाराष्ट्र! जय हिन्द!